## दप्तर अंक ८

### पुडकें क्र. ४--चालू

**मोकासे**— रघोजी भोसले (८८२६) ; हुजूर खासगीकडे (८३३, ८८९) ; नारायणजी निकम, कानोजी व जानराव महाडिक (८५०) ; नारायेणजी सेलास (८५१) ; बालोजी जाधव (८६०); कृष्णाजी गायकवाड (८६१); वेंकाजी जिवाजी (८६५); चिंतामणराव शिवदेव (८९१); आपाजी व नरसिंगराव जगताप (८९५); राघोजी जाधव (९०५); सेख मीरा (९०६); खंडेराव कासी (९०३९).

**याद्या**— जमाखर्चाची (८८१६); कृष्णाजी गायकवाडाकडील मोकासे गावाची (८२९); पत्रे पाठविलेल्या सरदारांची (८७८); भिवजी कासुर्डेच्या मोकासे गावांची (८८५); खंडेराव पंडिताकडील बाबती व मुकाश्याची (९२२-२३); सरकारी बैल चारणी गावाची (०५७).

**रोजकीर्दी पाने**—(८८०६–१३, ८१७–१९, ९२८).

**वतन**— संभाजी कडूस मोकदमी (८९६४).

**वराता**— कुवरजी शिर्के (९०२१); रखमाजी मोहिते (०३५); लक्ष्मण जाधव (०४०).

**सनदा**— मल्हारजी भोसलेचे जमिनीबाबत (८९९२); बाबुराव इंदूलकर यास सरनोबतीची (९०३२); वेतनात शेताच्या (०४८); वर्धनगडावरील आसामीबाबत वर्धनगडकऱ्यांना (०७१).

**समाधानपत्रे**—साबाजी नाईकास (८८९३); मालोजी भोसलेस (९३१).

**सरदेशमुखी**—रघोजी भोसले (८८२६).

**सरंजाम**— गोपालजी पांढरे (८८२१); महिपतराव सुमंत (९४४); उमाबाई गदाधर (९०१०).

**साहित्यपत्रें**—हैबतराव व गुणवंताबाई यांचे इनामाबाबत रघोजी भोसले, देशमुखाचे पुत्रास कैदेतून सोडून देणे व देशमुखाचे इनामास उपसर्ग न देणे म्हणून रघोजी, त्रिंबकजी भोसले व विसाजी रघुनाथ यांना (८९१८).

**हुजूरतलब**— महादजी कृष्ण (८८२०); पार्वतीबाईस मारल्याबाबत संभाजी तुंबेस (८२३); मुरारजी घोरपडेस फौजेसह (८४८); भिवजी कासुर्डेस (८५९); आपाजी रघुनाथास गुलाब महंमद लोणारीच्या वरातांसह (८६२); सिदोजी थोरात (८६८); धारोजी (८८३); पाटीलकी तंट्याबाबत आपाजी, भिकाजी व उदाजी पायगुडे यांना (८९६); गोविंद निसबत येमाजी शिवदेव (८९९); पागेच्या खासदारास मारल्याबाबत सोनजी पाटलास (९००); महादजी माने, सोनजी पाटील (९०३); बहिरजी जाधवास जखम केल्याबाबत महादू मानेस, न्हावीचे पाटील कुलकर्ण्यास (९१०); यशवंतराव पांढरेस (९५०); जाखोजी बेडा व दादजी दांगट यांना (९८६); कोकरे, जगथाप यांच्या तंटा इन्साफीकरिता जगतापास (९००६); बहिरजी यादवच्या मळचात घर बांधल्याबाबत सेठी खोतास, गोपाळ नाईक सराफास (००८); लक्ष्मण गोसावी, मोरो शंकर व आपाजी शिंदे यांच्या वतन तंटा इन्साफीसाठी दोघांना (०४१); सोनजी कदमाचे जमिनीबाबत मोकदमास (०४३); हारसेट बसकचे कर्जाबाबत आणाजी शिंपीस (०६३); आपाजी रघुनाथास (०७०).

---

### पुडकें क्र. ४-अ

का. सं. ९०७२–९३६८ (२९७); सु. ११५३, इ. स. १७५२.

**अभयपत्र**— महादजी खोडकेस (९३२३).

**आवर्जी**— तिथीवाराचा (९१४२, १५९); रोजकीर्दबंद (१९९, २०२–०३, २०९, २१२, ३०१, ३२१).

**आज्ञापत्रें**— सरदेशमुखाची गुरे सोडून देणेबाबत मानाजी बेरडास (९१४३); सरदेशमुखी ऐवज हैबतराव केशरकराकडे देणे म्हणोन प्रतापगडकरी यांना, हरिदास बैराग्याचे मठजागेस उपसर्ग न देणे म्हणोन कोडजी सेरकर व गोविंद कमाविसदार यांना (१४५); आपाजी बाबुराव जवळ सरकारी कापड

## दप्तर अंक ८

### पुडकें क्र. ४ अ—चालू

देणे म्हणोन रंगोजी मोहितेस, वाई खालसा अंमलापैकी १००१ रुपये भगवंतराव अमात्यास देणे म्हणोन हैबतराव भवानीशंकर यांस (१९१५१–५२); भिकाजी सिरके व साबाजी घाटगे सोयरिकसंबंधी साबाजी घाटगेस (१५३); नागेवाडीचा दसरा घट अमानत करून मोकदमीचा हक्क हुजूर पाठवणे म्हणोन वाईचे जमीदारास, चिंतामण चितळेस ऐवज देणे म्हणोन बालकोजी मानेस (१५५-अ); कजिया वारून हुजूर येणे म्हणोन मानसिंग शिंदेस, दादो हिराजीचे घरास उपसर्ग न देणे व जकात तगादा न करणे म्हणोन खंडो मल्हारास (१५६); सरकारचे खिलार चारणीस अडथळा न करणे म्हणोन जमीदारास (१७५); सुभान खंडोजीचे इनामाबाबत मोकदमास, हुजूरचे लोकास सायाची पाने घेऊ देणेबाबत नाणेघोलकरांस, उदाजी व सभसेट तांबोळी याचे सोईरिकेसंबंधात घटया गोसावीस (१७६); केंजलचे इनामासंबंधी हरजी चिकणेस (२८६); कृष्णाजी गायकवाडाची वस्तभाव व गुरे परतोन देणे म्हणोन सिवाजी सालोंखी यास (२८७); नारो बलालचे इनामाबाबत नारो बलाल व जमीदार यांना, बालाजी भिकाजीचे कर्ज फेडीबाबत सुभानजी माली, सिवराम भिकाजी व मोकदम यांना, श्रीदेव यात्रेचे ठिकाणचे हुजऱ्यांना वेतन देणे म्हणोन मोकदमास (२८८); जावळीचे धनगरास व सुभ्यास वरात तगादा न करणें म्हणोन धोंडो नारायण, जानोजी जाधव व प्रतापगडकरी यांना (२८९); निंबाजी पाटलाचे विहीरीस कटकट न करणें म्हणोन तुलाजी कोष्टयास, उबरज जकात ऐवजास खलेल न करणे म्हणोन गिरमाजी सखदेव व कमाविसदार यांना, उमाजी भोसलेचे जमिनीस व गल्यास वासुदेव अनंतकडून उपसर्ग न होय ते करणें म्हणोन जगजीवन पंडितास (२९०); जगजीवन पंडित हुजूर आलेवर अधिकारी पाठविले जातील म्हणोन जावळीकरांना, हुजूर खासगीचा ऐवज बाबुराव भोसलेकडे देणे म्हणोन मोकदमास, ठाणेचा बंदोबस्त राखणे म्हणोन रामाजी, आणाजी गोळे वगैरे सरदार यांना (२९१); पोलकराचा जामीन कतबा काढून घेणें व बाजारांचे वाण्यापासून जास्त जकात न घेणे म्हणोन रामाजी तुकदेवास, खासगी सेऱ्यांचा वसूल पाठवणे म्हणून चिकणगावकरीस, महिपतराव सुमंतचे इनामाबाबत अमृतराव निंबाळकर व जमीदार यांना, पालीची जकात सातारे किल्ल्यास देणेची ताकीद करणे म्हणोन लखमोजी भोसले व विष्णु रघुनाथ यांना (२९२); तुलसीराम चौधरीस वरातेचा ऐवज देणे म्हणोन बालोजी पाटीलास, मानाजी धामुणसाचे वतनाबाबत सोनजी म्हामुलकरास ताकीद करणें म्हणोन रायगडकरी व बाजी रुद्रास, महादाजी बापूजीची स्त्री द्वारकाबाईचे मुकाश्याबाबत आणाजी गोले व जमीदार यांना (२९३); दमाजी पिसाळास हुजूर पाठवणे म्हणोन सुलतानजी कदम यास (२९४); जानोजी जाधवचे इनामाबाबत गावास, आर्जोजी गायकवाडचे मुकासेबाबत गावास, हुजूर खासगी कमाविसी बाबुराव भोसलेस दिलेबाबत गावास (२९५); हुजूर खासगी गावाचा ऐवज पाठवणे म्हणोन बाबुराव भोसले यांस, बहिणाबाई आईची चोरलेली वस्तभाव घेऊन हुजूर येणे म्हणोन चवडोजी पाटलास, खासगी गावची गुरे नेल्याबाबत खंडोजी जगथापास, खंडोजीस ताकीद करणें म्हणोन सिवाजी सालोंखीस (२९६); वाठार या हुजूर खासगी गावाची कमावीस रामाजी गोरसेस दिलेचे, महादजी खोडकेवरील चौकी उठवून माणसें सोडणे म्हणोन आपाजी हणमंतचे वरातदारांना, रामचंद्रराव व पुरुषोत्तमराव यांचे खटावच्या इनामासंबंधी यमाजी सिवदेव व जगजीवन प्रतिनिधी यांना, खंडो व महादजी वाग यांचे अमानत वतन महादजी गोविंदकडून चालविले म्हणून १०० रुपये हुजूर घेऊन येणें म्हणोन खंडो पानसेस (२९७); उदाजी चवाणकडे गेलेला संताजी गुजर यास आणून पोचवणे म्हणोन मोकदमास, हैबतराव भवानीशंकर याच्या वर्धनगडचे हक्कासंबंधी, किल्ल्यास व शेतकरी यांना (२९८); जवारगज हती बरोबरील माणसांना वेतन देणे म्हणोन आपाजी हणमंतास, खालशाचा ऐवज रायगडास देणे व बाजी रुद्राचा माणस सोडून देणे म्हणून मंगलगडकरी व बाजीरुद्र यांना (२९९); महादजी खोडकेकडील सेरीचा ऐवज हुजूर येऊ देणे म्हणोन चंदन व वंदनगडकऱ्यांना, धारराव पाटणकराची गुरे सोडणेबाबत राजसबाई पाटणकरास (३००).

इनाम— गंगाजी विश्वनाथ (९०७५); खलोजी जाधव पुसेगावकर (०८५); गोविंद जोशी (०९३); नरसिंहाचार्य नरहराचार्य (०९९); अनाजी मुलीक, संकराजी रेणुसे (१०७); गुंडाचार्य कालेंगी (१३७); रामभट दीक्षित, बिडंभट अग्निहोत्री (१८९); धोंडभट जोशी (२४०); दर्याजी नाईक पवार (२५४); राणोजी अहिरकर (२५८); सटवोजी भांडवलकर (२६१);

## दप्तर अंक ८

### पुडकें क्र. ४ अ--चालू

खलोजी तिमाजी बुधवंत (९२८२); सुभानजी व गोंदजी अटक (३०५); नारो रुद्र देशकुलकर्णी (३१९); पिरधुडण, सुभानजी चिकणा (३५४); जोगोजी गायकवाड, गणकेश्वर (३६०); नारो रुद्र (३६५); हरछत्रगीर गोसावी (३६६-६७); पिरमहंमद (३६८).

**किरकोळ पत्र**--(९३२०).

**तलब**-- हुजूर ऐवजाबाबत राणोजी मान्यास (९०८५); कराडप्रांती धामधूम केल्याबाबत आनंदराव कृष्णास (०८६); वैद्यकी येते म्हणून सिदू न्हावीस (०९१); वनगलकर मुकदमास सुलतान जमातदाराचे सेताबाबत (१०१); हुजूर पत्राविसी अंताजी कुलकर्णीस (११४); कजियाबाबत सरुपजी व प्रतापजी माहाडिकास (११५); मेंढराबाबत बटकीचे कजियांत रघोजी पाटलास (११७); यशवंतराव पोल यांस (१३२); कजिया इन्साफासाठी शामजी व नथू बेलदार यास (१८५).

**ताकीद पत्रें** --विठल अनंतास हुजूर देशमुखीचे हक्क देवविणे म्हणोन आपाजी व बालकोजी पारटेस (९०७६); कृष्णाजी गायकवाडाकडील पागेस उपसर्ग देऊ नये म्हणोन उधो वासुदेव, उदाजी चवाण व गोपालजी भोसलेस (१४४); सिवाजी पाटलाची वस्तभाव परत करून हुजूर येणें म्हणोन सेटे महाजन कुळकर्णी व बाबुराव बतासे यांना, खासगी गावावरील रोखा मनाईबाबत प्रतिनिधी गोपाल शंकर व आनंदराव कृष्ण यांना, मच्छिंद्रगडचे गावची गुरे, माणसे सोडून देणेबाबत बाळाजी जाधवास, मच्छिंद्रगडचे गावास उपसर्ग न देणे म्हणोन सुभानजी सूर्यवंशीस, राजे महंमद बारगीराची नुकसानीबाबत सोनजी व जखोजी पाटलांना हुजूर पाठवणे म्हणोन प्रतिनिधी नागोजीराम, सोनजी व जखोजी यांना (१४७); खासगीचे गावातील ठाणे उठवणे म्हणोन सुभानजी सूर्यवंसीस, श्रीदेवाचे इमारतीसाठी पुताजी गौडा यांस साहित्य करणें म्हणोन मालोजी भोसले, शिंगणापूरकर, ब्राह्मण यांना, शंभूमहादेवाचे गावावर रोखे करू नये म्हणोन जगजीवन पंडितास (१४८); आनंदराव जगथापाचे मुकासा अंमलाबाबत बालाजी पंडितास, खासगी सरंजामास उपसर्ग दिलेबाबत उदाजी चवाण व येसुबाई डफळे यांना (१४९); कुसाजी व येसाजी भोसलेचे मुकासेचा वसूल पंडिताकडे देणे म्हणोन मोकदमास (१५१-५२); मुरार व त्रिंबक याचे वतनवादासंबंधी मोकदम व त्रिंबक हरीस (१६६); मच्छिंद्रगडचे मुकाश्यास उपसर्ग न देणे म्हणोन सिवाजी थोरात, गोपालजी भोसले, शामराव महादेव यांना (१८०); सातापा ठिगरेस उपसर्ग न देणे म्हणोन अमृतराव नाईक निंबाळकरास, सितापाचे साहित्य करणे म्हणोन उदाजी चव्हाण, साबाजी नाईक निंबाळकर, सिवाजी सालोंखे व जगजीवन पंडित यांना जिवाजी त्रिगुलचे कर्जासिंबंधी संताजी पाटलास, चिमणाई दाईचे मुकाश्यास उपद्रव न देणे म्हणोन मोकदमास, हुजूर खासगी जमीन रामजी नाईकाकडे दिलेबाबत रत्नाकर विठ्ठल यांस (१८१); सिवाजी सालोंखेकडील खासगी गावास उपसर्ग न देणे म्हणोन कानोजी मोहिते, आनंदराव कृष्ण, गोपाल शंकर, प्रधान इत्यादिस, करवीरवासी व पार्वतीबाई भोसले यांचे युद्धासंबंधांत उदाजी चव्हाण, घनःशाम नारायण, पार्वतीबाई भोसले वगैरेस (२९८).

**दस्तकें**-- सुभानजी घोरपडेचे कोठीचे बैलांस (९१०३); पिराजी भोसलेस गल्याचे, गंगाराम परदेसीस मेंढराचे, सुबुधराव निलकंठास गल्याचे (१०८); सरकारी जासूदांस लष्करचे (१२६); हुजूर कोठीचे (१७०); लखमोजी भोसल्यास कोठी बैलाचे (२०१); सीताराम कोठावलेस बैलाचे व सरदारांस साहित्याचे (२४०); भगवंतराव अमात्याचे कोठीचे बैलाचे (२४६); भवानीशंकरास कोठीचे (२४८); गोविंदभट रानडेस तांदुलाचे, रामचंद्र केशवचे भावजईस रहदारीचे (२६७); माहादजी आपाजीस रहदारीचे (२९८); बापोजी कानोजीस रहदारीचे (३०६); संताजी घोरपडेस रहदारीचे (३०८); नारो अनंतास रहदारीचे (३०९); बाबुराव सदाशिवचे कोठी कडील बैलास रहदारीचे (३१३); संताजी पवारास गल्याचे (३१८); बहिरूचें बैलास रहदारीचे (३२२); नवल्या रामचंद यास हरणे धरणेंबाबत (३३९).

**दान पत्र**-- समस्त ब्राह्मण कराडकर यास (९३१६).

## दप्तर अंक ८

### पुडकें क्र. ४ अ—चालू

पत्रें— सखोजी भांडवलकराच्या गल्यास जकात घेऊ नये म्हणोन सरदार व पागे सिलेदार वगैरेस (९०७४); नवरात्राचे जिनस हुजूर पाठवावे म्हणोन गिरजोजी मोरे कोपलकरीस, मंगलगडचे तनख्याबाबत मोकदमास, सेटयाजी पवार व हिरोजी कोकाटे याचे वेतनाचे गावास उपसर्ग देऊ नये म्हणोन जगजीवन प्रतिनिधीस (०७५); खासगी गावाकडील वसूल धोंडो केशवास देवविणे म्हणोन आपाजी व बालोजी पारटेस, मुरारजी हिंदुरावास हुजूर बोलावणेंचे, नरसिंहपूर या अग्रहार गावास उपसर्ग न देणे म्हणोन पार्वतीबाई भोसलेस (०७६); बिबी बेगम इचे नेमणुकीबाबत हैबतराव भवानीशंकरास, घाटमेटाचे बंदोबस्तीसंबंधी मकरंदगडास, किलेकऱ्याचे सेताबाबत चंदनगडास, जुतराज मिरसिकार याचे ऐवजाबाबत मोकदमास (०७७); मल्हारजी गायकवाडास हुजूर सेरी कमाविस दिलेबाबत चिमणाजी सचिवास, किल्ल्याची मजबुती व तनख्याबाबत मंगलगडास, घाट-मेटाचा बंदोबस्त करणें म्हणून केशवजी सिंदा व बहिरो भगवंत, आपाजी व बालकोजी पारटे व अमृतराव येरुणकरास (०७८); सखोजी जगदलेस असामी दिलेबाबत महिमानगडास (०७९); जयगडचे सरंजामासंबंधी सुभ्यास व जकातदारास, बाजी अनंतकडे ऐवज द्यावा म्हणोन हैबतराव भवानी शंकरास (०८०-८१); चव्हाणाचा उपसर्ग न लागे म्हणोन सिवाजी भोसलेस, दिवाणाच्या ऐवजाबाबत सुलतानजी घाटगेस, कजिया चौकसीबाबत हुजूर येणें म्हणोन यादजी फडतरेस (०८२); कृष्णाजी गायकवाडाचे पागेस कुरण दिल्याबाबत मोकदमास, विष्णु नरहरीस कुणबीण दिल्याबाबत (०८३); खासगी गावास उपसर्ग न देणेबाबत सिवाजी सालोंखीस व कानोजी मोहितेस, आकणाजी महादेवास खासगी गाव कमाविसी दिलेबाबत, धोंडोपाध्ये पंडितराव यांचे मुकासेबाबत साहित्यपत्र, उत्सवाचे साहित्याबाबत सुलतानजी घाटगे, सिवाजी सालोंखी वगैरेस (०८४); केशवाचार्याची व गावची मालियत परतोन देणे म्हणोन कानोजी मोहितेस, अंताजी प्रयागचे इनामा-बाबत जमीदार व प्रतिनिधी व खालस्यास (०८५); कमाविसदार व पाटील सोडून देणे व खंडो रायाजीस हुजूर पाठवणे म्हणोन जगजीवन प्रतिनिधीस, मासे हुजूर पाठवणेबाबत गावास, सदू महाजनास हुजूर पाठवणेंबाबत प्रतापजी महाडिकास (०८६); देवराव अमणाजीस किल्ल्याची कारखानिसी दिलेबाबत सदाशिवगडास, रुद्राजी नरहरीकडे नाडगौंडकी अंमल द्यावा व धोंडो गोविंदचे पथकीवतन सुरलित द्यावे म्हणोन सिवाजी सालोंखीस, जोत्याजी दलवीची म्हैस हुजूर आणणे म्हणून कुसाजी कापसास (०८७); नारळ रोपे पाठवणें म्हणोन तुलाजी आंगरेस, सबनिसीसंबंधी कल्याणगडकरीस, किल्ल्याचे तनख्याबाबत वारुगडकरीस, कृष्णाजी गायकवाडचे गावास उपद्रव न देणे म्हणोन वर्धनगडास (०८८); मकाजी यादवास खातरजमेचें, हत्तीचे चारापाण्याचा बोभाट येऊ न देणे म्हणोन चिमणाजी पंडित सचिवास (०८९); निलकंठभट उमराणीकरास घरास जागा दिल्याबद्दल कऱ्हाडच्या जमीदारास (०९०); वर्धनगडकरी व बावाजी झुंजारराव घाटगे यांचे कजियातील गावाना एकमेकांनी परस्परास परत करावा म्हणोन वर्धनगडकरीस, गोपाल अनंताचा परामर्ष घेणें म्हणोन तुलाजी आंगरेस, निरंजन परमहंस यांचे कर्जाची फारखत केलेबाबत मोकदमास, कचोऱ्याची फुलें पावली म्हणोन येमाजीपंतास (०९१); खासगी गावची मालियत परतोन देणें म्हणून येसूबाई डफळीस, निंबकर मोकदमास अभयाचे, संताजी व मल्हारजी गायकवाडास हत्तीची रखवाली सांगितलेबाबत, संभाजी कडूकडील पाटीलकी चौकशीबाबत (०९२); सैद यासीनचे इनामासंबंधी जगजीवन प्रतिनिधीस, जानराव यादव सोलसकरास हुजूर बोलावणेंचे, रहिमतपूरकर माने यांचे कर्ज फेडणे म्हणोन सिदोजी व नाईकजी व भैराटजी घारगेस, वडूरचे मोकदमास गावावर राहाणेंचे अभयाचे (०९४); भगवंत नरहर देशकुलकर्णी यांचे वतनासंबंधी साहित्याची, दमाजी माने व सरकारची वस्तभाव परत करणे म्हणोन बच्याबाई घाटगेस (०९५); एक कुणबीण हुजूर पाठवणे म्हणोन व्याघ्रगडास, कोंबडयांचे हिसेबाबत मोकदमास, कासाई रणनवरेची वस्तभाव जोत्याजी काटकरचे स्वाधीन करणे म्हणून संताजी व मोकदमास (०९६); खासगीचे गावास उपसर्ग न देणे म्हणोन जगजीवन प्रतिनिधीस व जिवाजी बंडगरास (०९७); महबूब नाईकिणीचे दाण्याचे बैलास मुजाहीम न देणें म्हणोन सातारकरास, ढालास काठ्या पाठवणें म्हणोन राजसबाई पाटणकरास, सरकारी सेरीस खलेल करू नये म्हणोन वर्धनगडास (०९८); निंबाजी काटकर व सेट्याजी जगदला व सुभानजी नलवडा यांस मनाईचे, दादंभट होसिंगचे इनामास उपसर्ग न देणे म्हणोन मोकदमास (०९९); आनंदराव कृष्ण याचे लोकास अटकेंत ठेवणे म्हणोन किल्ले सातारकरास, भवानी मिरघेस इनाम

## दप्तर अंक ८

### पुडकें क्र. ४ अ—चालू

दिलेबाबत मोकदमास (९१००); हैबतराव केशरकराकडे सरदेशमुखी अंमल देणे म्हणोन चांदजी सिरके व्याध्रगडकरीस, खासगी जमीन कमावीस रामाजी नाईकाकडे दिलेसंबंधी मोकदमास (१०१); धोंडो उपाध्ये पंडितरावाचे गावास उपसर्ग न देणे म्हणोन सिवाजी सालोंखी व खंडोजी जगथापास, कर्ज तगादा होणार नाही म्हणोन नाईक अनगल यांस (१०२); सुभानजी हिंदुराव घोरपडेचे कोठीचे बैल चारू देणे म्हणोन हणगोजी जगथापास, नाग जोश्याचे स्त्रीचे कासीयात्रेचे कर्जफेडीसाठी इनाम हुजूर ठेवला म्हणून मोकदम व हैबतराव भवानीशंकर यांस, वाघोजी व मल्हारजी गायकवाडाचे मिरासी जागेबाबत हैबतराव भवानीशंकरास, आपाजी विठलास मुकासा अंमल देणे म्हणून मोकदमास, कुसाजी जाधवाचे घरावरील भुते काढावी म्हणून गणू सोनारास (१०३); आबाजी जाधवाचे जागेवर घर बांधू नये म्हणून रंगो हवालदार व मोकदमास, श्रीशंभू महादेवाचे गावचा वसूल बाजी गोलेस देणे म्हणोन गावास, रामाजी नाईक बुधवंतास खासगी जमिनी लावणी करणेंस दिलेबाबत मोकदमास (१०४); हैबतराव केशरकरकडील सरदेशमुखी अंमलास उपद्रव न देणे म्हणून कानोजी सिरके, तुलाजी आंगरे व सरदारांस, सरदेशमुखीकडील गुरे सोडून देणे म्हणून मोकदमास व सुभानजी सूर्यवंशीस (१०५); रत्नाकर विठ्ठलचे देशमुखी-बाबत गावास वगैरे, भगवंतराव सालोंखीस उपद्रव न देवविणे म्हणून जगजीवन प्रतिनिधीस, बहिरजी थोरात, महादाजी जाखदेव व पांडुरंग राम हुजूर आले म्हणून वसवसा न धरणें म्हणोन सुभानजी सूर्यवंसी व बाल गोपाल भोसले यांस, धरण पाण्यासंबंधी मोकदमास (१०६); गोपालजी भोसले व सुभानजी सूर्यवंसी यांची वरात मना केलेबाबत, रत्नाकर विठ्ठलकडे चौथाई माभला दिले-बाबत माहालास (१०७); सरकारी खिलारे जराबाजरा सोडणे म्हणोन सुलतानजी कदम व साबाजी घाटगेस, खासगी गावावर रोखा न करणे म्हणोन सुभानजी सूर्यवंसीस, सिवराम पंडित अमात्यांचे साहित्य करणे म्हणोन चिमणाजी सचीव, हैबतराव भवानीशंकर वगैरेस, सरकारी जमिनीस अडथळा न करणें म्हणोन जमनाजी माहाडिकास (१०८); कृष्णाजीराव पालांडेस मुकासा दिलेबाबत मोकदमास, तगाई ऐवजास पाटील जामीन देणे म्हणोन स्वरूपजी सिपीस, खासगी गावास उपसर्ग न देणे म्हणोन येसूबाई डफली व बाल गोपाल भोसले यांस, खासगी गावचा वसूल देणे म्हणोन गावास (१०९); खासगीचे गावास ठाणे घालू नये म्हणोन सिदोजी थोरात व सुभानजी सूर्यवंसी यांस, रामचंद्र विठल याजकडे खासगी जमीन दिलेबाबत मोकदमास व हैबतराव भवानी शंकरास, हुजूर ऐवज पाठवणे म्हणोन त्रिंबकजी भोसलेस (११०); प्रतापगडचे सरंजामासंबंधी माहालांस वगैरे (१११); किल्ल्याचे सरंजाम गावाबाबत चंदनगडकरी व मोकदम यांस, खासगी गावाचे रसदेबाबत मोकदमास (११२); हुजूरचा ऐवज सुरळीत न देणे म्हणोन मोकदमास, भगोजी सालोंखेस हुजूर येण्याविसी, खासगी गावचे पाटील कुलकर्णी सोडून देणे म्हणोन जगजीवन प्रतिनिधीस (११३); चंदनगडचे मुकासगावाबाबत मोकदमास, सोन ठाकूर यास घर बांधणेची जागा करार करून दिलेबाबत गावास, दसरेची रसद पाठवणे म्हणून गावास, सिवराम पंडित अमात्यांचे साहित्याबाबत पांडवगडास (११४); खासगी गावास उपसर्ग न देणे म्हणोन सिवाजी सालोंखी, येसूबाई चवाण यांस, कराडची देशमुखी मुतालिकी माहादाजी नारायण याजकडे दिले-बाबत माहादाजी कृष्णास (११५); नारायण सिवराम यास किल्ल्याची सबनिसी दिलेबाबत प्रतापगडकरीस (११६); रामजी नाईक बुधीवंताकडील खासगी सेरीबाबत मोकदमास, सरदेश-मुखी वसुलाबाबत आपाजी व बालकोजी पारटे व अमृतराव येरुणकरास, संताजी आंबेकराचे कर्जसंबंधी मेलगिरी सोनारास (११७); हुजूर ऐवजाबाबत रघोजी भोसलेस, पोशाख पाठविले-बाबत राजसबाई पाटणकरास, गावास उपसर्ग न देणेबद्दल बऱ्हानजी व यशवंतराव मोहिते यांस, खासगी गावावरील बाबुराव भोसलेचा घासदाणा रोखा उठवणेबाबत (११८); देशमुखी इनाम-जमीन सेख महंमदचे स्वाधीन करणें म्हणोन मोकदम व रत्नाकर विठल यांस, कृष्णाजी गायक-वाडाचे पागेचे गावास व ठाण्यास उपसर्ग न देवविणे म्हणोन प्रतिनिधीस, खिलारे व वस्तभाव परतोन देणें म्हणोन यशवंतराव मोहितेस, गणोजी झेंडे याचे साहित्याबाबत सुभानजी सूर्यवंशी व सिदोजी थोरात वगैरेस (११९); प्रतिनिधी व येमाजीपंतांनी हुजूर यावे म्हणोन येमाजी पंतास, दमाजी पिसालचे गावासंबंधी गावास वगैरे, कदीम सरंजाम करार करणेंबाबत आपाजी व बालकोजी पारटेस बोलाविणें, लिंगोजी व खंडोजी गायकवाडाची मालियत परतोन देणें म्हणोन सिदोजी थोरातास (१२०); महादजी पाटीलावरील वाळीतपण खोटे असलेबाबत तडयेच्या महादजी

## दप्तर अंक ८

### पुडकें क्र. ४-अ—चालू

पाटील व जमीदार यांना, लक्ष्मणजी जाधवाचे मुकासा गावाची गुरे परत करणे म्हणोन जगजीवन प्रतिनिधीस (९१२१); हुजूर कारकून पाठवणे म्हणून राणोजी घाटगेस, वेंकाजी जिवाजीचा मुकासा गाव अमणाजी महादेवचें स्वाधीन केलेबाबत बाबाजी जाधवास (१२२); दमाजी पिसालाचा गाव व वतन अमानत केलेसंबंधी मोकदमास (१२३); हैबतराव केशरकर याचे सरदेशमुखीचा अंमल देणेबाबत चिमणाजी पंडित सचिवास, सिवाजी सालोंखीचे स्वारास रोजमुरा देणे म्हणोन खंडेराव मोरेश्वर व बाबुराव भोसले यास, सिवाजी सालोंखीचे देशचौंगुलकी इनामास उपसर्ग न देणे म्हणोन गावास, खासगी मोकदमीवर रोखे न करणे म्हणोन नागोजी राम व बरानजी मोहिते व प्रतिनिधी व यशवंतराव मोहितेस (१२४); घोडी चोरीसंबंधी अटकाविलेल्या ताथवडा किल्ल्याचे बेरडास सोडून देणे म्हणून जगजीवन प्रतिनिधी व किल्ल्यास (१२५); गुळींचेकर मोकदमास गाव वसाहतीचे, देशमुखीचे इनाम खंडोजी भोसलेकडे दिलेबाबत मोकदमास व सिवाजी सालोंखीस, पूजेचे हत्यारासंबंधी रंगोजी मोहितेस (१२७); सरकारी हत्तीची बेगमी करणे म्हणोन चिमणाजी पंडित सचिवास, संभाजी जाधवची मालियत परतोन देणे म्हणोन आनंदराव देशमुखास (१२८); कमलगडचे माची व घाटाचा बंदोबस्त करणेसंबंधी पिलाजी व रामाजी गोले व हशम लोकांस, येमाजी भोसलेस वेतनांत जमीन देणे म्हणून मोकदमास, जनकोजी चव्हाणाचे मुकासेबाबत मोकदमास, आकोजीराव पाटणकराचे वतनी गावास उपसर्ग न देणे म्हणून राजसबाई पाटणकरास (१२९); सेख सुलतान जमातदार यास वतनाऐवजी जमीन दिलेबाबत माहालास, श्रीभवानी प्रतापगडास मोकासा दिलेबाबत जमीदारांस, भिवजी कासुडेचे मुकासेबाबत मोकदमास, येसाजी महादेवास गावी सुखरूप राहू देणे म्हणोन नारो महादेवास (१३०); सदाशिव साखरेचें कर्जाबाबत तुकोजी मान्यास, मस्त हत्तीच्या बेडया काढाव्या म्हणोन चिमणाजी सचिवास, जान माली याचे घर जागेस उपद्रव देऊ नये म्हणोन मोकदमास (१३१); अमृतराव निंबाळकर व फतेसिंग भोसले यांचे मुकासा गांवास उपसर्ग होतो म्हणोन फत्तेसिंग, सौ. आनंदीबाई व अमृतराव निंबाळकरास, सुभानजी घोरपडयाचे तांबोल्यास मुजाहीम न होणें म्हणोन जकातदारांना (१३२); सत्यनाथपुरमठ कजिया इन्साफासाठीं हुजूर येणें म्हणोन दाऊदशा काजीस, बेरडांनीं चोरलेली सरदेशमुखीची गुरे नदीपार नेली म्हणोन नावाडे उतारेस हुजूर बोलावणेचे, रामाजी पवाराची गुरें परतोन देणें म्हणोन सुभानजी सूर्यवंसीस (१३३); तुकोजी गायकवाडकडे हुजूर गांव दिलेबाबत आपाजी रघुनाथ व जमीदारांस (१३४); मिरज देशमुखी वतनासी कजिया करूं नये म्हणोन सिवाजी सालोंखी, उदाजी चव्हाण व जमीदारांस, बहिरजी इंगलेस धान्य द्यावें म्हणोन रंगोजी मोहिते सातारा किलेकरीस, म्हसावद खासगी गांव चंद्रराव पवारानें घेतला त्यास तंबी देणें म्हणोन प्रधान व महिपतराव कवडे व आबाजीपंत यांस (१३५); वतन कजियाबाबत हुजूर येणें म्हणोन गोपालजी यादवास, बहिरजी यादवाचे सेतात घर बांधू नये म्हणून सेटयाजी यादवास, सरकारी खिलारें परतोन देणें म्हणून सुलतानजी कदमास, सरकारी खिलारास उपसर्ग न देणें म्हणोन बऱ्हानजी मोहिते व बच्याबाई घाटगेस, खासगी गांवावर रोखा न करणें म्हणोन गोपाल शंकरास (१३६); सुभानराव मोहितेशीं कजिया न करणें म्हणोन बऱ्हानजी मोहितेस, धोंडजी सिंदेची हत्यारें वस्तभाव परतोन देणें व घाटमेटाची खबरदारी घेणें म्हणोन आपाजी व बालकोजी पारटेस (१३७); पाटीलकी कजियाबाबत कान्होजी खाडे यास हुजूर पाठविणें म्हणोन येसाजी जगजीवनास, कमाविसदाराकडील सरकारी खिलार चारणेस कुरण दिलेबाबत मोकदमास (१३८-३९); कालोजी भंडारी निकम यास पाटीलकीबाबत (१४०); साहित्य करणेंसंबंधी संतोषगडकरी यांना, कारकून हुजूर पाठवणें म्हणोन बाबाजी ढोणेस, हुजूरचें गांवांसंबंधी जगजीवन पंडितास, कामासाठीं येणें म्हणोन खटावकर बेलदारास (१४३); बाबा गावडा व धनगर यांना सरकार अैवज तगाद्यासंबंधीं आपाजी पारटे व अमृतराव येरुणकर यांना, विश्वंभर गोसाव्याचे इनामासंबंधी गांवास (१४५); विश्वंभर गोसाव्याचे उपाध्येपणाचेसंबंधी खाडे व बेलसरे यांना ताकीद देणें म्हणोन मोकदमास, महादजी नलावडेचे इनामासंबंधी सचीव व जमीदार यास (१४६); किला बेगमी ऐवजाचा हिशोब पाठवणें व किलाबेगमी करणें म्हणोन यशवंतराव महादेव व अंतोजी घाटणे यांना (१५०); कल्याणगडची सबनिसी खंडो रामाजीस दिल्याबाबत खंडोजी नरसाळेस, राजजी गायकवाडाचे घरास उपसर्ग न देणें म्हणोन पांचवडच्या कान्होजी गायकवाड वगैरेंना (१५१); भगवंतराव पंडित व करवीरकर तंटयासंबधीं नारो

## दप्तर अंक ८

### पुडकें क्र. ४-अ—चालू

सिवदेवास, पंडितास साहित्य करणें म्हणोन सिवाजी सालोंखी, हरिराम नारायण, गोपालजी भोसले वगैरेस (९१५१-५२); हुजूर कारकून पाठवणें म्हणोन जानोजी निंबाळकरास, हणमंतराव सावंतचे मुकाशाचे गांवलुटीचा ऐवज परत करणें म्हणोन सिवाजी सालोंखी व चवाण यांना, संताजी घाटगेच्या गांवास उपसर्ग न देणें म्हणोन उदाजी चवाणास (१५३); धनसिंग जाधवाचें पाटीलकी व दसरा तंटचाबाबत पवार पाटलास, बहिरजी ढमालेची गुरे परत करणेबाबत सुभानजी सूर्यवंशीस, टोणगे पाठवणें म्हणोन सिवाजी सालोंखी, हैबतराव भवानीशंकर व रत्नाकर विठ्ठल यांना (१५४); आणाजी आपाजी व अपाजी नरसिंगराव देशमुखाचें गांवांस उपद्रव न करणें म्हणोन सिवाजी सालोंखे व नारायण व्यंकटेश यांना (१५५); जगजीवन पंडिताकडून कल्याणगडचे गांवांस उपद्रव लागणार नाहीं म्हणोन किलेकरी व प्रतिनिधी यांना (१५५अ); नाईक जाधवचे इनामासंबंधीं मोकदमास (१५७); नागनाकचें घरावर दंगा केल्याबाबत बालनाकासह हुजूर येणें म्हणोन संतनाक व सुभाननाक बेरड यांना, परशराम दामोदर बरोबरील जिनस मिळालेबाबत व अरबी १० घोडे पाठविणें म्हणोन तुळाजी आंगरेस, मसाला तगादा न करणे म्हणोन मालजी संकपाल वगैरे व भंडारे यांना (१५८); हुजूर खासगी गांवांस उपसर्ग न देणें व श्री. महादेव व रिणासिंध यांचें गांवांस इजारा मजरा देणें म्हणोन जगजीवन पंडितास, गिरजी सेटनी दिलेली जमीन दुमाला करणें म्हणोन आमणाजी महादेवास, सरकार खिलारास उपसर्ग न देणें म्हणोन माहादजी सालोंखी व सुलतानजी घाटगे यांना (१६६); सेनेसह हुजूर येणें म्हणोन मुरारजी घोरपडेस, मुरारजीस घेऊन येणें म्हणोन जिवाजी व्यंकटेशास (१६७); गावांचे हिशोब घेऊन हुजूर येणें म्हणोन जमीदारास (१६८); मोजुदिनशा बारगीरचे इनामासंबंधी प्रतिनिधीस (१६९); अफलापूर व सैदपूर सीमा नेमून देणें म्हणून जमीदारांस, अनंदराव भिकाजीचे कर्जासंबंधांत हुजूर येणें म्हणोन विठा व महादा मांग व सेटी यादव यांना, रघुनाथ पंडिताचे गांवांस उपसर्ग न देणें म्हणोन सिवाजी सालोंखीस, महादजी सालोंखीची जमीन हुजूर ठेऊन कमाविशी रामजी नाईकास सांगितलेबाबत, फिरंगोजी विथापाचें वतनास अडथळा न करणें म्हणोन शहाजी विथापास (१७०); जिवनराव शिंदेचे इनामास उपद्रव न देणें म्हणोन गोपालजी भोसले व सिवाजी सालोंखी यांना (१७१); हुजूरपागेचें धान्य व तूप पाठविणें व खासगी गांवांस उपसर्ग न करतां तेथील पाटील कुलकर्णी सोडून देणें व मलीक मेहेतरचें इनामास उपसर्ग न देणें म्हणोन जगजीवन पंडित व यमाजीपंत यांना, अंदोजी नलवडेचे तंटचासंबंधांत हुजूर येणें म्हणोन लुयाजी नायकू रघु, सिवतराव व तुकोजी चव्हाण यांना (१७२); खासगीकडील वसूल सिवाजी सालोंखेस देणें व सरदेशमुखी ऐवज हुजूर पाठवणें म्हणोन देवराव मेघःशाम व जमीदार यांना, धोंडी उपाध्येची गुरें व वस्तभाव परतोन देणें म्हणोन सिवाजी सालोंखे व खंडोजी जगथाप यांना (१७३); सावध राहाणें म्हणून संताजी भोसलेस (१७४); खासगी गांवचा वसूल सदाशिव सामराजास देणें म्हणोन जमीदार, प्रधान व सचिव यांना (१७८-७९); कमलगडचे सरंजामासंबंधीं गांवास व महालास (१८२); सिंपी याची माणसे सोडून देणेंबाबत बाबुराव भोसलेस, सरकारी खिलारास उपसर्ग न देणें म्हणोन सुलतानजी घाटगेस, परशराम सिंदे याचें इनामसंबंधीं सचिवास (१८३); गहनगडचे सरंजामाबाबत गांवांस, सिवाजी सालोंखीचे चौथाई मामलेबाबत गांवास, सखारामचे कर्ज देणें म्हणोन रामावा भोसलेस, खंडोजीचे कर्जाबाबत सेटी देवकांतास (१८४); कृष्णाजी गायकवाडाचे पागेकडील गांवांस उपसर्ग न देणें म्हणोन जगजीवन प्रतिनिधीस, धारजी पवाराचीं गुरें परतोन देणें म्हणोन जानोजी चव्हाणास, श्रीचे गांवावर रोखे न करणें म्हणोन भगवंत महादेवास, सरकारी कुरणांतील गवताबाबत गांवांस (१८५); लाडांचें पाटिलकी वतन संभाजी कडून दिलेबाबत जमीदारास (१८६); हरिदास मोदीचे जिनसीचे बैल परतोन देणें म्हणोन गावास, यमाजी व बाजी कांदटकर महिपतगडकरी याजकडोन बंदुखाची मागणी होणार नाहीं म्हणोन त्यांस, दरसाल २०० रुपये वजा होतील म्हणोन रूईकर मोकदमास (१८७); हुजूर येणें म्हणोन व खासगीचे गांवांस उपसर्ग न देणें म्हणोन जगजीवन प्रतिनिधीस, बकऱ्याबाबत महादजी नाईक निंबाळकराकडून उपसर्ग होणार नाहीं म्हणोन सकुबाई निंबालकरास, जमावासह हुजूर येणें म्हणोन विरोजी जाधवास (१८८); किल्ल्याचे सरंजाम गावासंबंधी चंदनगडकरीस, मेटकरी व महार यांचे कजिया इनसाफ करणेबाबत सुभानराव मोहिते वर्धनगडकरी यांस (१९१); सिवाजी सालोंखीचे चवथाई ऐवजास उपसर्ग न देणें म्हणोन जमीदारास (१९२); सरकारी मोकदमी भगवंत

## दप्तर अंक ८

### पुडकें क्र. ४-अ--चालू

पवाराकडे दिलेबाबत गांवास व नरसो विठल व जमीदारास (९१९३); पाडाव झालेले सुलतानजी घाटगे यास इतमामाने परत पाठवणें म्हणोन सिवाजी सालोंखीस (१९४); महिपत माहादेवास कारखानिसीची मदतनिसी दिलेबाबत वर्धनगडकरीस, येमाजी जाधवास आसामीचें सेत दिलेबाबत वर्धनगडकरीस (१९५); वारुगडची घोडी परत करणें म्हणोन तुको राम नाईक निंबाळकरास, साबाजी नाईकास तंबी देणें म्हणोन वारुगडकरी यांस, नागोजी रामास खातरजमेचें, वतन कजिया इनसाफासाठीं येसाजी व बहिरू पाटीलास हुजूर बोलावणेंचे, नारो दादाजीकडील हुजूर गांवास दमाजी पिसालाचा उपसर्ग न होय ते करणें म्हणोन देवराव मेघःशाम, तुको नाईक निंबालकर व जमीदार यांना, बेरडांची समजूत करणें म्हणोन सुभानराव मोहिते वर्धनगडकरीस (१९६); देवराव कचेश्वरचे कोठीचे बैल येऊं देणें म्हणोन सरदार सिलेदार व मानाजी आंगरे यांना, देवराव कचेश्वरचे इनामाबावत संकराजी यादवास, हुजूर ऐवजापैकीं बावाजी झुंझारराव घाटगे यांना देणें म्हणोन प्रतिनिधीस (१९७); सरदेशमुखीबाबत महालास व सरदारास (१९८); करवीरकर आमात्य कलहांत कृष्णराव आमात्यांचें सहाय्य करणें म्हणोन राणोजी घोरपडे व आपाजी घाटगे यांना (२००); जोगोजी गायकवाडाचें मुकाशास उपद्रव न देणें म्हणोन चिमणाजी सचिवास, बापूसेट वैद्यास वरातेचा ऐवज पावविणें म्हणोन रघोजी भोसलेस, चांभाराकडून घेतलेला ऐवज परत करून अलफखान पठाणाची सिवाजी भोसलेकडून सुटका करून येणें म्हणोन मालजी चव्हाणास, श्रीदेव ब्राह्मणांचें इनामास उपसर्ग न देणें म्हणोन महादाजी आपाजीस (२०४); हुजूर येणें म्हणोन मानाजी जगथापास, किला जतन करणें व सिवाजी सालोंखीस दिलेले पत्राबावत फिकीर न करणें म्हणोन सुभानजी सालोंखी सदाशिवगडकरीस, मानाजी जगथापास हुजूर पाठवणें म्हणोन प्रतापगडकरीस (२०५); महादजी खोडका याचे गल्यास उपसर्ग न करणें म्हणोन कल्याणगड, चंदन व वंदन यास, पिराजी व आपाजी खराडे यांस रायगडावर नेमलेबाबत (२०६); पांडवगडचे तनख्यास उपसर्ग न देणें म्हणोन प्रतिनिधी व अजबसिंग भोसले पांडवगडकरी व स्वार यांना, अर्जोजी सिरकेचे सेतास उपद्रव न देणें म्हणोन मंगलगडकरीस (२०७); जानोजी जाधवास जमीन दिलेबाबत गांवास, अर्जोजी गायकवाडचे मुकासेबाबत गांवास, बाबुराव भोसलेस खासगी कमावीस दिलेबाबत गांवास, रखमाजी मोहितेस अैवज देणें म्हणोन खंडो रघुनाथास, संतु कुंभारास हुजूर बोलावणे, जोती रसालचे स्त्रीस हुजूर पाठवणे म्हणोन कल्याणगडकरीस, हुजूर येणें म्हणोन जोतीस, राणोजी दलवीस कमलगडपैकीं जमीन देणें म्हणोन गांवांस, खंडनाकचें कर्ज फेडणे म्हणोन धोंडनाकास, भिकाजी भोयास हसिलनगादा न करणें म्हणोन सेटे महाजनास, धनाजी मान्याने खिलार चारलें म्हणोन हुजूर बोलावणेंचें (२१०); चिमाबाई सिर्केचे गांवास उपसर्ग न देणें म्हणोन रंगोजी मोहिते किले सातारकरीस (२११); केशवराव सिंदे याच्या चोरलेल्या म्हशी परतोन द्याव्या म्हणोन मोकदमास, राघोबा उपाध्ये पंडितराव यांचे इनामास उपसर्ग न देणें म्हणोन रघोजी व सिदोजी पाटील यांस, अमणा नाईकीणीचें घरासी कजिया न करणें म्हणोन हैबतराव भवानीशंकरास (२१३); सावर्डे पागेचें गांवास उपसर्ग न देणें म्हणोन उधो वासुदेवास, खंडोजी भोसल्याचे खिलार चारणीस अडथळा न करणें म्हणोन दस्तकवजा, सर्वोत्तम बजाजी व नरसावा नाईक यांचें कर्जफेडी संबंधी व नारो पाटलास पाठविणें म्हणोन (२१४); विश्वनाथ वैद्यास हुजूर येणें म्हणोन, कृष्णाजी वासुदेवचे निसबतीचे पाटलाकडून स्वारी पटी घेऊं नये म्हणोन प्रतिनिधी व गांवास (२१५); बलराम मोदीस अैवज द्यावा म्हणोन खंडो रघुनाथास, खासगी गांवांची कमावीस निलकंठ बापूजीस सांगितलेबाबत प्रतिनिधी व सरदार यांना, हुजूर येणे म्हणोन मकाजी यादवास, दंगा न करणें म्हणोन प्रतापगडकरीस (२१६); हुजूर पागेचें गांवांस उपसर्ग न देणें म्हणोन सिदोजी थोरात, फकीरजी यादव व सिवाजी सालोंखी यांना, गोविंदराव पिसालचे कर्जाबाबत गांवांस (२१७); कराड देशमुखी माहादाजी कृष्णकडे दिलेबाबत, जोगोजी यादव याची शिल्लक वस्तभाव परतोन देणें म्हणोन अंबाजी गोविंद यास (२१८); ठाण्याचा बंदोबस्त राखणें म्हणोन पार्वतीबाई भोसलेस, रामाजी उधव, गोपाल शामजी व बालो पाटेकर यांना हुजूर बोलावणेंचे, हुजूर चाकरींतील पाटलांचे जमिनीवर स्वारी पटी घेऊं नये म्हणोन गांवांस, मान्या पाटलास हुजूर पाठवणें म्हणोन गांवांस, हिशोब घेऊन येणें म्हणोन वांगणी व उबरेचें मोकदमास, सरजापूर खासगीकडे ठेवलेबाबत गावास, मल्हारजी भोसलेकडील खासगी गांवास उपसर्ग न देणें म्हणोन बाजी प्रल्हाद यास (२२०); संताजी नाईक जासूदाचे मोकाशास उपसर्ग न देणें म्हणोन

## दप्तर अंक ८

### पुडकें क्र. ४-अ—चालू

बाबुराव भोसलेस, मदसूदनगिरी, उदेयगिरी व कर्णगिरी गोसावी यांचे कर्जफेडींत चांदवडतर्फा चालाव्या म्हणोन गोविंद खंडेरायास, चिमाबाई सिरकेचे इनामाबाबत जमीदारास (९२२१); वैराटगडचे तनख्याबाबत गांवास, खासगी गांवास उपसर्ग देऊं नये म्हणोन सिवाजी सालोंखीस, व्याघ्रगडचे मुकास गांवाबाबत मोकदमास, खासगी गांव प्रतिनिधीनी मुधोजी भोसलेस दिला त्याचा अंमल न देणें म्हणोन मोकदमास, वाघोजी कामथेचे खिलार चारू देणे म्हणोन मोकदमास, धोंडजी इंदुलकरचे गांवास उपसर्ग न देणें म्हणोन विठोजी निकम यास (२२२); राजापूर प्रांतीचे लोकांची वस्तभाव परतोन देणें म्हणोन पार्वतीबाई भोसलेस, जीवनराव सिंदेचे इनामास उपसर्ग न देणें म्हणोन बालगोपालजी भोसले व सरदार यांना, मच्छिद्रगडचे तनख्यास उपद्रव न देणें म्हणोन पार्वतीबाई भोसलेस (२२३); जमाव मुशाराचा अैवज देणें म्हणोन माहादाजी जनार्दन यास, हैबतराव याची म्हैस सोडणेंबाबत सुभानजी मोहिते वर्धनगडकरीस, खासगी गांवांचा वसूल सिदाजी सालोंखीस देणें म्हणोन मोकदमास, सोईरिकीबाबत संताजी सेटे यांस (२२४); नलवडे व करंडे यांचे मुकदमी कजियासंबंधीं घनःशाम नारायणास, बहिरजी चिकणे यांचे वतन–जमिनीबाबत त्यांस, जनार्दन जोशी व श्रीनिवास आपाजी यांचे सरसेटपणाबाबत अमणाजी महादेवास, खासगी गांवावर रोखे करूं नये म्हणोन येमाजीपंतास, धनसिंग जाधवाचे पाटिलकीसंबंधी गांवास, संताजी थोराताचे वतनसेरणी पत्र पाठवावें म्हणोन मल्हारजी होळकरास (२२५); सातारा किल्ल्याचे सरंजामाबाबत माहालास व गांवास (२२६-२७); धर्मराजपंतास हुजूर पाठवणें म्हणोन उदाजी चव्हाणास, मानसिंग जाधवाचे घोडीस जकात घेऊं नये म्हणोन निंबाजी कराडा यास, सोनाई वाणिणीचे कर्ज फेडावें म्हणोन मानाजी चव्हाणास (२२८); त्रिंबक चिंतामणी देशकुलकर्णी यास ऋणमुक्त करणें म्हणोन मानाजी आंगरेस (२२९); संताजी घाटगेचे मुकाशास उपसर्ग न देणें म्हणोन मोकदमास (२३०); मोरो खंडेरावास सेत देणें म्हणोन वंदनगडास, सूर्याजी इंदूलकराची वस्तभाव परतोन देणें म्हणोन पार्वतीबाई भोसलेस, सरंजाम नुकसानीबाबत संभुसिंग जाधवास (२३१); बऱ्हाणजी मोहित्याचे गांवास सरदेशमुखीचा तगादा न करणें म्हणोन हैबतराव केशरकरास, निंबाजी काटकराकडे खासगीचा गांव दिलेबाबत, संताजी गायकवाडाकडील गांवाबाबत मोकदमास (२३२); गंगाधर चिटणीस यांचे तांदूळ आणू देणें म्हणोन, धारकरी पाटलास हुजूर चाकरीस पाठवणें म्हणोन मोकदमास, जवारगज हत्तीबाबत गांवास (२३३); नरसिंह भट आचार्याचे बाबत कमलगडकरीस, जीवराव यशवंतराव मोहितेस हुजूर बोलावणें, जकातीचा वसूल देणेंबाबत गावास, गुरांची जकात देणें म्हणोन सुभानजी धुमालास (२३४); दमाजी पिसालास दस्त करून पाठवणें म्हणोन देवराव मेघःशामास, विष्णु नरहरीचे गांवास उपसर्ग न देणें म्हणोन बालगोपाल भोसलेस, सिधोजी थोरात व प्रतिनिधी यांना, राणोजी कदम चोपदाराचा दंड परतोन देणें म्हणोन धारराव पाटणकरास, धोंडजी इंदुलकराची वस्तभाव परतोन देणें म्हणोन पार्वतीबाई भोसलेस, सरकारी कुरणास उपद्रव न करणें म्हणोन गांवास (२३५); नरसोजी गौली याची जनावरे परतोन देणें म्हणोन वारूगडकरीस, सरकारची गुरें परतोन देणें म्हणोन बावाजी झुंजारराव घाटगेस, सरकारी कुरणांत नांगर न धरणें म्हणोन सजनगडकरीस, मोरो नरहरी यांजकडे तासगांवची चिटनिसी व सबनिसी दिलेबाबत खंडोजी जगथापास, सुलतानजी व जगदेवराव घाटगे यांचे प्रकर्णी सिवाजी सालोंखीस (२३६); सरकारी खिलारे परतोन देणें म्हणोन यशवंतराव मोहितेस, रुद्रपुरी गोसाव्याचे कर्ज फेडणें म्हणोन भिकाजी पिसालास, सुलतानजी व निंबाजी ठेवरे यांस हुजूर बोलावणें (२३७); सिवाजी सालोंखीचे चौथाईबाबत गांवास, तुकाजी चोर यास फसवेगिरी बाबत हुजूर पाठवणें म्हणोन महिमानगडकरीस, सोईरिकींत पैसे घेतले म्हणोन राणोजी जगदलेस हुजूर बोलावणें (२३८); सभापूर पेठ लुटीचे कजियाबाबत राजसबाई व धारराव पाटणकरास (२३९); जयगड तनखे गांवांबाबत व्याघ्रगडकरी, कानोजी सिरके, जकातदार जयगडकरी व तुलाजी आंगरे यांना (२४०); आंब्यांची पोहोंच प्रतिनिधीस, रामावा गोटास उपद्रव न देणें म्हणून कमाविसदारास, गोदुबाई सिंदेचे गांवास उपसर्ग न देणें म्हणोन उधो वासुदेवास, खिलारे सोडणेंबाबत प्रतिनिधी, अमृतराव व तुको राम नाईक निंबाळकर यांस, हिशोब घेऊन येणें म्हणोन निंबाजी, सुभानजी, जानोजी व जमनाजी पाटील व नरहरपंत कुलकर्णी यांना, सरकारी खिलारास उपसर्ग न करणें म्हणोन सिवाजी सालोंखीस, सिदोजी चावरा व विठोजी सेटगा यांचे सोईरिकेबाबत राणोजी मान्यास, विठोजी माहाडिक व संभाजी जाधव व

## दप्तर अंक ८

### पुडकें क्र. ४-अ—चालू

मानाजी चव्हाण व सुभानजी व बहिरजी रणनवरे व रंगोजी काकडे यांचे जमिनीस उपद्रव न देणें म्हणोन मोकदमास (९२४१-४२); जोत्याजी व वाघोजी जाधवाचा मुशारा देणें म्हणोन नवलोजी कदमास, रायगडकरी व कृष्णाजी पलांडे व दरेकर याचे कजिया चौकसीचे राजिनामे घेणें म्हणोन मोकदमास, गुन्हेगारीबाबत हुजूर येणें म्हणोन सिवाजी नाईक घाटेस, धारराव निंबाळकरास मुकासा अंमल देणें म्हणोन गांवास, त्रिंबकजी घुमरे याचे अैवज कजियाबाबत हुजूर येणें म्हणोन विठोजी पवारास, रत्नाकर विठ्ठलचे चौथाईस खलेल न करणें म्हणोन गिरजाई घाटगीस, व्यंकटराव गंगाधरनी कर्जापोटी नानोबास जमीन दिलेबाबत गांवास, मल्हार जगनाथचे पुत्रास सबनिसी दिलेबाबत मबाजी पानसरे प्रतापगडकरीस, अंतोजीचे कर्ज मानाजी शिंदेने घेतले त्याबाबत संताजी सिद्यास बोलावणेंचे, पाटील कुलकर्णी यास हिशोब घेऊन हुजूर पाठवणें म्हणोन जमनाजी महाडिकास (२४४); जोत्याजी जाधवास अभयाचें, रामचंद्र गोसावीचे कर्जफेडीबाबत खंडोजी पिसालास, कुवरजी सिरकेस मुकासा दिलेबाबत गांवास व कमाविसदारास (२४६); मोने दिनशा बारगिराचे इनामास उपसर्ग न देणें म्हणोन कानोजी सिरकेस, चिमी व रामदास यास गवत नेऊं देणें म्हणोन जमीदारास, छटू बारगिराचे जमिनीस उपसर्ग न देणें म्हणोन आनंदराव कृष्णास (२४७); खासगी गांवासंबंधी बाबुराव माणकेश्वरास (२४८); धारकरी व राबता महार हुजूर येणें तकुब केले म्हणोन मोकदमास, सिराले प्रांतात दंगा होऊं न देणें म्हणोन यशवंतराव गायकवाड व आबाजी घाटगे यांस (२४९); शाहूगडचे तनख्याबाबत कानोजी सिरकेस, खोपकरचे मुकासे गांवाबाबत तुलाजी आंगरेस, श्रीवागजाई इनाम गांवास वेठबिगार माफीसंबंधीं प्रतिनिधीस, दाभाड्याकडील लोकांचे बेगमीबाबत आपाजी रघुनाथास (२५०); सुलतानजी घाटगेस हुजूर पाठवणें म्हणोन सिवाजी सालोंखीस (२५० अ); संताजी काकडेचे इनाम गांवचे वसुलीबाबत मोकदम आपाजी हणमंत व कानोजी सिरके यांना (२५१); जानोजी जाधवचे विद्यमाने कारभार करणें म्हणोन धोंडो नारायण प्रतापगडकरीस, पेडंबकरचे मुकाशास तगादा न करणें म्हणोन कानोजी सिरके व कमाविसदारास, हिशोब घेऊन येणें म्हणोन खासगी गांवचे मोकदमास (२५२); गलाकोठीसंबंधीं सदाशिवगडास (२५३); खासगी गांवावर रोखे न करणें म्हणोन निलकंठ महादेवास, वाजवी अैवज घेणें म्हणोन बाबुराव भोसलेस, जिवाजी घाटगेची मालियत परतोन देणें म्हणोन गिरजाबाई घाटगीस, पिंपवडचे जकात वसुली व सरदेशमुखीबाबत सेटे महाजनास, प्रभुणे याचे जमिनीस उपसर्ग न देणें म्हणोन जगजीवन प्रतिनिधीस, राणोजी भोईटेस जकातीचा तगादा न करणें म्हणोन जकातदारास, सोईरिकी कजियाबाबत सिवाजी व खेत्रोजी मोकदमास (२५५); जाना मांग, सदाशिव रघुनाथ, रुका, नवला व कृष्णा मांग यांना हुजूर यावे म्हणोन, भगवंत महादेवाचे इनामाबाबत सचीव, कोनेर त्रिंबक, प्रधान व जमीदार यांना (२५६); आणाजी मुळकचा पुत्र सोडणे व सयाजी आबरेची वस्तभाव परतोन देणे व अरबी घोडे पाठवणें म्हणोन तुलाजी आंगरेस, आबाजी व रामचंद्र विठल यांजकडे खासगी सेते सांगितलेबाबत गांवांस, खासगी गांवांतील वस्तभाव परतोन देणें म्हणोन खंडोजी जगथापास (२५८); वाघू महाराचें कर्ज फेडणें म्हणोन जानू व बहिरू महारास, महादजी सिंदे याचें सरंजामास उपसर्ग न देणें म्हणोन जगजीवन प्रतिनिधीस, राणोजी व हंसाजी वगैरे बारा नामजादी लोकांचे मुकासेबाबत मोकदमास (२५९); किल्ल्यावर आसामी नेमून पाठविलेबाबत मंगलगडकरीस (२६०); श्रीसंस्थान प्रतापगडसंबंधी कबजी सोनवणीस, भिवजी कासुर्डेकडील गांव खासगीकडे घेतलेबाबत जमीदार व रामजी मल्हार यांना (२६३); दमाजी पिसाल व तुकोजी पोल यांचे कजियाबाबत खंडो गिरमाजीस, सरकारी गुरें सोडून देणें म्हणोन खंडोजी जगथापास, लिंगोजी हवलदार व फरसखानाकडील गांवची मालीयत सोडून देणे म्हणोन बालगोपालजी भोसलेस, जयगडास जिनस पाठवणे म्हणोन गांवास, येसाजी धुमाळची वेतनात जमीन दूर केलेबाबत मोकदमास, खासगीचे गावावरील रोखे मना करणें म्हणोन प्रतिनिधीस, अनंदराव महाडिकचे पाटीलकीबाबत जमीदार, पाटील, खोत, सेटे महाजन वगैरेस (२६४); कृष्णाजी वासुदेवचे जमिनीच्या ताकिदीची, सुभानराव देडंबकरास हुजूर बोलावणेंचे, धोंडो बलाळास किलेची सबनिसी दिलेबाबत विचित्रगडास (२६५); अनंदराव महाडिकचे पाटीलकी संबंधी जमीदार वगैरेस, खंडोजी धुमाळची वेतनांत जमीन दूर केलेबाबत मोकदमास (२६६); रेवण गांवचे पाटील कुलकर्णी याचे हुजूर बोलावणेंचे, रेवणगांवास उपद्रव न देणें म्हणोन जमीदारास, त्रिंबकजी घाटगे सर्जेरावास मोकासा दिलेबाबत गांवास, येमाजी रुद्र व सिवाजी

## दप्तर अंक ८

### पुडकें क्र. ४-अ--चालू

सालोंखीस हुजूरचे तुकोजीबरोबरील खिलार चारू देणें म्हणोन मोकदमास (९२६७); हुजऱ्यास जहाजांतून तुळाजीकडे पाठवणें म्हणोन हवालदार व कारकून गोवळकोट यांस, सरदेशमुखी वसुलाचा उपसर्ग न देणे म्हणोन मोकदमास (२६८); मंगलगडचे तनख्याचे गांवासंबंधी, सरकारी कुरण्यासी तंटा केल्याबाबत हुजूर येणे म्हणोन हरि महादेव यास, फौजबंदी करून करवीरकरांचें निवारण करणे म्हणोन प्रतिनिधीस (२६९); पार्वतीबाईस दंगा न करणेची ताकीद करून सिवाजी थोरात व बावाजी सालोंखीसह मुलुक संभाळणे म्हणोन घनःशाम नारायण मंत्री, पार्वतीबाई व सिवाजी सालोंखीस, नारायणराव घोरपडेस वसूल न देता रघूजीस देणें म्हणोन मोकदमास, शामराव महादेव यांनी केलेल्या तहाप्रमाणें सरदेशमुखी देणें म्हणोन मोकदमास (२७०); खासगी मोकासा भगवंतजी पवारकडे देणें म्हणोन नागोजी रामास, कमलगडकरीचे सेताबाबत देशाधिकारीस, नारायण बाबास इनाम दिलेबाबत जमीदार वगैरेस (२७१); बराणजी मोहितेचे इनाम गांवची गुरे सोडणेबाबत सुलतानजी कदम यास (२७२); करवीरकरांचे तोंडावर जमावसुधा राहाणे म्हणोन पार्वती भोसले, घनःशाम मंत्री व सिवाजी सालोंखी यांना, सुभानराव पेडमकरास हुजूर येणें म्हणोन (२७२-अ); मच्छिद्रगडचे तनखा गांवास रोखे न करणें म्हणोन सिदोजी थोरातास, तुकाराम निंबालकराकडून सरकारी खिलार सोडवून देणें म्हणोन जगजीवन प्रतिनिधीस, कोठीचे मीठ देणें म्हणोन हैबतराव भवानीशंकर यास, कुरणांतील गवताबाबत मोकदमास, खासगी गांवावरील रोखे मना करणें म्हणोन जगजीवन प्रतिनिधीस (२७३); नाईकजी भोसलेस गाव दिलेबाबत मोकदमास, बहिरजी भणगेस हुजूर बोलावणेचे, तानीचे कर्जफेडीबाबत केदारजी गोगावलेस (२७४); भिकाजी जाधवाचे सेतास उपद्रव न देणें म्हणोन मोकदमास, सिदोजी व महादजी ढोले याचे कबिल्यास उपद्रव न देणें म्हणोन भूषणगडकरीस (२७५); रामसिंग व नारायणजी पोळाचे इनामाबाबत मोकदमास (२७६); रामचंद्र जोशी याचे वतनाबाबत भिकोबा व विठोबा रास्ते व गृहस्थ वाईकर यांना, महादाजीराव सिंदे यांस मोकासा दिलेबाबत मोकदमास (२७७); मच्छिद्रगडचे तनखियाचे गांवास चौथाई न घेणें म्हणोन सिवाजी सालोंखीस व किला सांभाळणे म्हणोन मच्छिद्रगडास, संकराजी पाटलाचे वतन हकाबाबत गांवास (२७८); सातारा किल्याचे गांवावर रोखें न करणें म्हणोन जगनाथ मलारास, बहिरजी नलावडेचे सेत वस्तभावसंबंधी सातारा किलेकरीस, सिवापा गौलीस हरजिनस आणूं देणेंचे (२७९); मोहिते पाटील व वस्तभाव सोडवून देणें म्हणोन व कृष्णा मांगास धरून आणणें म्हणोन बाबुराव भोसलेस, बोलीप्रमाणे रयतेकडून वाटणी घेणें म्हणोन नागोजी रामास, बहिरो आबाजीस कराराप्रमाणें म्हैस देणें म्हणोन निंबाजी बेरडास (२८०); महादजी भणगेचे गवत कापू नये म्हणोन चिमीस, अनंदराव सुमंतकडील नाडगौडकी वतन खासगीकडे ठेवले म्हणोन गांवास (२८१); राघोजी उपाध्येचे कर्जाबाबत खंडोजी जगथापास, धोंडो उपाध्ये पंडितराव याचे गांवास उपसर्ग न देणें म्हणोन सिवाजी सालोंखीस (२८२); प्रतिनिधीस चार किल्ल्यापैकी एक देणें म्हणोन बराणजी मोहिते, विठल बयाजी, सदासिव दीक्षित व इनाईत अलीखान यांना, जिवराव सिंदे यांचे गांवास उपसर्ग न देणें म्हणोन पार्वतीबाई भोसले व सिवाजी सालोंखी यांना (२८३); गुरे चारलेबाबत समजावीस करणें म्हणोन रयतेस, तारलेचे उदम्यास जकात तगादा न होये म्हणोन आबाजी महाडिकास, आनंदराव सुमंतचे इनामाबाबत गांवास (२८४); अनंदरावचे नाडगौडकी वतनाबाबत गांवास (२८५); खासगी सेन्याची कमावीस रामाजी गोसेस सांगितलेचे, कानोजी मोहितेचे युद्धात साहेब-काम केले म्हणून खंडेराव बक्षी, सिलेदार हुजरात, शेषराव निा पागा, कृष्णाजी गायकवाड, केशरकरचे लोक व महादजी शिंदे यांना (२९५-३००); सुमंतांची नाडगौडकी खासगीकडे ठेवलेबाबत गुत्रोलीकरास, अग्रहार गावांबाबत राणोजी दलवीस, राणोजी दलवीचे जमिनीबाबत गावांस (३०२); हुजूर मुकासेबाबत मोकदमास, नारायणजी हवालदारचे इनामाबाबत सुभानराव मोहितेस, कृष्णाजी गायकवाडाचे गावास उपसर्ग न देणें म्हणोन सिवाजी सालोंखेस, उर्जिताबाबत मानाजी चोरकरास (३०३); देवराव तुकदेव मार्फतचे कर्ज हुजूर पाठवणे म्हणोन भिवजी कासुर्डेस, बनाजी नरसिंह कुलकर्णीकडील कर्जाबाबत रामचंद्र पुरीस (३०४); अमृतराव खोपडेचे मुकासेबाबत जमीदार व हैबतराव भवानीशंकर यांना, हैबतराव केसरकराकडील सरदेशमुखी गावाबाबत मालजी राणे यास, येसाजी सूर्यवंसीचे जमिनीसंबंधी गांवास, हैबतराव केसरकराचे गल्यास कजिया न करणें म्हणोन गांवास, देणेंघेणें कजियाबाबत

## दप्तर अंक ८

### पुडकें क्र. ४-अ—चालू

हुजूर येणें म्हणोन सुलतानजी पाटीलास (९३०५); राणोजी सिंदा यास गुन्हा माफी केलेमुळे तगादा न करणें म्हणोन गांवांस व राणोजीस सेरीचा गला हुजूर आणणबाबत अजबसिंग पांडवगडकरीस, सेन्याचे गल्यास अडथळा न करणे म्हणोन सजनगडकरीस (३०६); फरासखान्याकडे जिनस पाठविणेबाबत रत्नाकर विठल यास, राघो कृष्णास सागवान आणू देणें म्हणोन जानोजी जाधवास, आपाजी हणमंतचे सेतास उपद्रव न देणें म्हणोन गिरमाजी सखदेवास (३०७); वेतनाचे गांवांबद्दल कालोजी धनवडेस (३०८); श्रीपालीचे हुजरे जामदाराचे मोईनीबाबत मोकदमास, खासगी गांवांवर रोखा करू नये म्हणोन अंबिकाबाई दाभाडेस, हुजर कोठीकडून जकात न घेणें म्हणोन कानोजी मोहितेस (३०९); वणगोजी निंबालकर व आणाजी चारगे याचें हकदारीबाबत, पागा नेमणुकेसंबंधी जगजीवन यास (३१०); कामथी गांव खासगीकडे ठेवल्याचे प्रतापगड तनखा गांवाबाबत येसाजी लक्ष्मण, जानो गणेश व चिमी हलवारीण यांना (३११); श्रीचे गांवांस उपसर्ग न देणें म्हणोन आपाजी महादेवास (३१२); फिरंगोजी बटीक सोडून देणें म्हणोन गोलेस, मलजी चव्हाणाचे मुकासेबाबत जमीदारास, गुणाजी सिरवला याचे तैनातीसंबंधी सचीव व जमीदार यांना (३१३); नरसोजी व जमनाजी महाडिक यांना कजिया चौकसीसाठी हूजूर पाठवणे म्हणोन संभाजी माहाडिकास, फिरंगोजीची बटीक सोडणें म्हणोन गोलेस (३१४); देशमुखीपैकीं हुजरात लोकांचे वेतनाबाबत (३१५); सरकारी बाग रखवालीबाबत माहादजी खोडके व सुलतानजी खराडे यांना (३१८); जिवनराव सिंदे यांचे इनामास उपसर्ग न देणें म्हणोन सिवाजी सालोंखीस, सरकारी खिलाराबाबत महालास, मदारखान मेहेतर फत्तेखान व दाऊदभाई याचे मुकासेबाबत मोकदमास (३२२); खासगी गांवांस उपसर्ग न देणें म्हणोन सचिवास, सेरीचा वसूल पाठवणे म्हणोन सुभानजी पाटील यास, महादजी खोडकेचे जमिनीसंबंधी सजनगडास (३२३); हुजूर येणें म्हणोन येमाजीपंतास, बाबुराव सदाशिवचे लोक व किलेकरी यांचे कजियासंबंधात संतोषगडास, हुजूर येणें म्हणोन खंडोजी वाघ यास, पर्वतराव भोसलेची वस्तभाव परतोन देणें म्हणोन कानोजी मोहितेस, नरसिंहाचार्याचे जमिनीस कजिया न करणें म्हणोन राणोजी दलवीस (३२४); महादजी खोडकेकडील खासगी गावास उपसर्ग न देणें म्हणोन येमाजी सिवदेवास, कृष्णाजी गायकवाडाचे पागेसंबंधी प्रतिनिधी व सुलतानजी कदम यांस, हुजूर येणें म्हणोन बहिरजी निंबालकरास (३२५); ब्राह्मणांचे जमिनीस उपसर्ग न देणें म्हणोन बाजी गोले यास, मान्या पाटलास पाठवणे म्हणोन मोकदमास, सिताराम लोणारीस लाकडें आणूं देणें म्हणोन सजनगडकरीस (३२६); फत्तेसिंग भोसलेचे सेरीसंबंधी मोकदमास, फरासखानीचे रोखे माघारे टाकले म्हणोन मोकदमास, रघुनाथपंतास वरातेचा ऐवज देणें म्हणोन चिमणाजी पंडित व कृष्णाजी त्रिंबक यास (३२७); रामलिंग जंगमास जमीन दिलेबाबत मोकदमास (३२८); भवानजी केशरकरकडील सरदेशमुखीबाबत तुलाजी आंगरेस (३२९); नारायणजी हवालदाराचे इनामाबाबत वर्धनगडास, विठोजी जाधवास जमाव बेगमीस मुकासा दिलेबाबत पंतप्रधान व जमीदार यांना, वैराटगडचे तनखागांवास उपसर्ग न देणें म्हणोन येमाजीपंतास, संताजी आंबेकराचे कर्जाबाबत आबाजी माहाडिक वगैरेस (३३०); श्री. शंभू महादेवाचे इनामास उपसर्ग न देणें म्हणोन येमाजीपंत यांस, बराणजी मोहितेचा देशमुखी हक देणें म्हणोन मोकदमास, सुभानजी जगदल्याचे वाड्यावर घर बांधू नये म्हणोन सेटी कोष्टीस, गांवांचे पाटील सोडणेंबाबत येमाजीपंतास (३३१); बेरडांनी चोरलेली गुरें परतोन देणें म्हणोन मोकदमास, वर्धनगडकरी यांचे सेतासंबंधी मोकदमास, सूर्याजी यादवचे जमिनीवर रोखे न करणें म्हणोन सुभानजी सूर्यवंसीस (३३२); रत्नाकर विठलचे चौथाईबाबत, बालाजी भिकाजीचे इनामसंबंधी सिवराम भिकाजीस, केशवराव सिंदे याच्या म्हशीचा माग लावून देणें म्हणोन गांवांस, बालाजी भिकाजीची नेमणूक पाववणे म्हणोन महादजी कृष्ण यास (३३३); सिवाजी सालोंखीकडील खासगी गावास उपसर्ग न देणें म्हणोन येमाजीपंतास, करवीरकरास तंबी देणेंस सरदार येतात तरी ठाणे बंदोबस्ती करणें म्हणोन सिवाजी सालोंखीस, देवराव कचेश्वर व दिनकराव जगनाथचे गावास उपसर्ग न देणें म्हणोन आनंदराव कृष्णास, महिपतराव सुमंताचे नाडगौडकीबाबत गांवास (३३४); सलाबतजंगास तंबी दिली म्हणून शाबासकीचे बालाजी प्रधानास (३३५); राणोजी कदमाचे ऐवजाबाबत भागोजी व विठोजी यादव यांस (३३६); कानोजी मोहितेस हुजूर आणणें आहे म्हणोन येमाजीपंतास, बाबुराव विठलचे भाऊ व त्रिंबक लक्ष्मण यास हुजूर पाठवावे म्हणोन कानोजी

## दप्तर अंक ८

### पुडकें क्र ४-अ—चालू

मोहितेस, हुजूर येणें म्हणोन बागोजी मांडरेस, तुलजोजीकडील मुकासेबाबत मोकदमास (९३३७); किल्ल्यावर हवालदार घेणें व सबनीस कारखाननीस हुजूर पाठवणें म्हणोन प्रचितगडास (३३८); सेटचाजी सालोंखीचे जमिनीवर रोखे न करणें म्हणोन सिवाजी सालोंखीस, श्रीगणकेश्वराचे इनामाबाबत गांवास व नरसिंहाचार्यास (३३९); राणोजी व हंसाजी भिलारे यांचे मुकासेबाबत खंडो नारायण हवालदार व गांवांस, कालोजी व भिवजी धनवडेचे मुकासबाबत मोकदमास, हैबतराव जगदले याचे जमिनीसंबंधी मोकदमास व वंदनगडास, सरकारी रमण्याचा रखवालीबाबत संक्राजी जिवाजी यास (३४०); खासगी गांवांस उपसर्ग देऊ नये म्हणोन बाजी अनंतास, संताजी घाटगेचे मुकास गांवांबाबत साबाजी घारगेस (३४१); कालोजी व भिवजी धनवडेचे मुकासेबाबत खंडो नारायण व जमीदार यांना, पागेचे घोडे पोचले म्हणोन सिवाजी सालोंखीस, सरकारी सेऱ्याचा कथला करू नये म्हणोन सुभानराव मोहिते वर्धनगडकरीस, अंदोजी नाईक जाधवचे इनामसंबंधी शामराव माहादेवास (३४२); संतुबाई घाटगेस खातरजमेचे, किल्लेकऱ्याचे बेगमीसंबंधी महिमंडणगडास, किल्यास उपसर्ग न देणें म्हणोन तुलोजी आंगरेस, धनसिंग जाधवास मुकासा व पाटीलकी परत केलेबाबत (३४३); मानाजी व सुलतानजी फडतरे यांचे सेतास उपसर्ग न देणेंबाबत सुभानजी मोहिते वर्धनगडकरीस (३४४); धनसिंग जाधवास मुकासा व मुकदमी दिलेचे (३४५); अमृतपंडित प्रतिनिधीचे खिलाराबाबत येमाजीपंत व प्रतिनिधीस (३४६); महिमंडणगडाबाबत तुलाजी आंगरेस (३४७); गावावरील रोखा मना करणे म्हणोन बाजी प्रलादास, बाबुराव सदाशिव व किल्लेकरी यांचा सलूख झाला म्हणून त्यास किल्यावर घेणें म्हणोन संतोषगडकरीस (३४८); प्रतापगड सरंजामाबाबत ताकिदीची, हुजूरचे लोकांकडून जास्त कर न घेणें म्हणोन सुवर्णदुर्गकरीस (३४९); हरि खंडेरायास हुजूर महालची कमावीस सांगितलेबाबत प्रधानास (३५०); फत्तेसिंग भोसलेचे जमिनीबाबत परशराम सिंदेस, कुसाजी भोसलेचे स्त्रीचे साहित्यासंबंधी शामराव महादेव व बाबाजी थोरात यांना, मलीकभाई व मियाभाई यांचे जमिनीस उपसर्ग लागो न देणें म्हणोन येमाजीपंतास, सखाई भुतीणीस गुन्हा माफीचे व संतापा भिलेस खरेपणाचे (३५१); धोंडभट जोशीस घर बांधणेंस जमीन दिलेबाबत प्रतिनिधी, जमीदार इत्यादींस (३५२); मिरजा हुसेन बेगचे मुकासा वसुलाबाबत मोकदमास, मध पाठवणे म्हणोन कृष्णाजी अनंत यास, रेणावीगांव श्रीस इनामाबाबत जमींदारास (३५३); नूरखान याजवरील रोखा मना करणें सजनगडास, बाल्या चांभाराची ध्वाडी परतोन देणे म्हणोन मोकदमास (३५३-अ); सटवोजी काटकरकडे खासगी मुकासा असलेबाबत जमीदारास (३५४); श्री व्यंकटेशाचे गांवांस उपसर्ग देणारे कमावीसदारांचे पारपत्य करणेंबाबत सयाजी आटोलेस, संताजी जगथापचे पागेचे मोईनीबाबत प्रतिनिधीस, बाबाजी नाईक टाकलकराचा हिशोब देणेंस श्रीपती लाखल्यास, देऊलगावी पाठवावा म्हणोन कंठाजी बांडेस, वेंकाजी देशपांडेचे वतन अमानत करणें म्हणोन सचीवास, काजीचे जमिनीबाबत केंजलकर मोकदमास, हैबतजी सिंदेचे जमिनीबाबत जमीदारास, मंगलगडचे घेऱ्यात पटचा वसवू नयेत व खालसा अंमल देणें म्हणोन बाजी रुद्र यास, हिरोजी चोरग्याचे सेतास उपद्रव न देणें म्हणोन रामजी अहिरे यास, बिवट्या व मोहकांदे पाठवणें म्हणोन जमीदारास (३५६); चव्हाणाचे मुलकास उपद्रव न देणें म्हणोन सिवाजी सालोंखीस, खंडोजी बाणरावास सोडून देणें म्हणोन दमाजी गायकवाडास व खंडोजीस, सौभाग्यवती अंबिकाबाईस खातरजमेचें व वस्त्राची पाठवणी, मिरजकर मुलकांत उपद्रव करणार नाहींत म्हणोन उदाजी चव्हाणास, कोलापुरी उपसर्ग न देणें म्हणोन पार्वतीबाई भोसलेस (३५७); हुजूर हत्ती संभाळणेंबाबत सचीवास, सटवोजी कोल्यास हुजूर पाठवणें म्हणोन मोकदम व कोली यांना, सैद महंमद व रफाई फकीराचें इनामाबाबत, रुद्राई आईचे इनामाबाबत गांवास व हैबतराव भवानीशंकरास, इनामाबाबत सदाशिव रास्तेस, कुरणाबाबत संताजी पवारास (३५८); राणोजी भोसल्याचे पागेकडे जिनसा आणू देणें म्हणोन संताजी पवारास, संताजी काकडेस जिल्हेचा अैवज देऊं नये म्हणोन प्रतिनिधी व येमाजीपंत यांना, उदाजी चव्हाणाचे मुलकांत धामधूम न करणें म्हणोन येमाजीपंतास (३५९); मेणबत्या मोईनीचा अैवज दादो हिराजीस देणें म्हणोन, भगवंतराव नटवा याचें जमिनीबाबत मोकदम व हैबतराव भवानीशंकर यांना (३६०); सजणा व यमुना नाईकिणीचे इनामाबाबत मोकदमास, गोरीखान व मसुदखान यांचें वतनाबाबत रामाजी यादव यांना (३६१); सिवाजी भोसलेचे मुकासेबाबत सिवाजी सालोंखीस (३६२); हुजूरकोठीचे बैलाचे रहदारीसंबंधीं सरदारास (३६३); सेटी वाडेकर

## दप्तर अंक ८

### पुडकें क्र. ४-अ—चालू

याच्या म्हशी देणेंबाबत मोकदमास, जामिनकीचा निर्गम करणें म्हणोन रामजी देसाई व लिंगो कासी यांना (९३६४); बेरडास हुजूर बोलावणेंचे (३६६); गला पाठवणें म्हणून मोकदमास, भोईंजकरावर मसाला केलेचे, खेत्रोजी पाटलास सोडून देणें म्हणोन कानोजी मोहितेस, संताजी हगवणा व व्हाणाजी यांचें सोईरिकेवादासंबंधीं सिवाजी पांडुरंगास (३६७); उतराजी भोसले-कडील जमीन खासगीकडे ठेवल्याबाबत मोकदमास (३६८).

**बक्षीसपत्र**—धोंडो नारायण मजमदारास सरकारी कुणबीण (९१३४).

**मसाला**— देशमुखी जमीन तंटयाबाबत मोकदमास (९०७४), आपाजी मोगला व निंबाजी सूर्यवंसी, रामचंद्र सामराज (०९३).

**मुकासे**— कमलगडकरी (९०८२, ०८५); खंडेराव सिंदे, सटवोजी सिंदे (२९२); सदासिवगड (३४३).

**याद्या**— समजाविसी केली त्या किल्ल्यांची (९०७३), नवरात्रांचें जिनसांबाबत (१३२), विजयादशमीचे नजरांची (१६०–६५); किरकोळ (१७७); संभुसिंग जाधवराव, दमाजी पिसाल, भोसले सरदाऱ्या व सरलस्कर यांजकडून दहक अैवज घेणेंची (२१९).

**रोजकीर्दबंद**—(९०७२).

**वतनपत्रें**— विठल सामराज याचें देशपांडेपणाचें (९२०८); माणको मोरेश्वर व बाजी सिवरामचें देशकुलकर्ण अमानत करून रामाजी कासीचें दुमालाचें (३१९).

**वरात**— जगजीवन प्रतिनिधीवर बावाजी झुंझारराव घाटगेस (९१२२).

---

### पुडकें क्र. ४-आ

का. सं. ९३६९—९७०७ (३३९); सु. ११५३; इ. स. १७५२.

**अभयपत्रें**— कऱ्हाडचें बाजारची आबादानी करणेंबाबत विष्णुपंत मुजूमदारास (९४००); चिंचनेरास आबादानी-करिता (५०३); बाबाजी झोऱ्याचें लेकास (५०५); नाईकजी घाटगेस सोईरिकीसंबंधी (५५९); सोयरो नरसिंहास घर करून राहणेंबाबत (५७४); वडगांव-दमाजीपंतास (५७६); चोरडगांवास (६२८); लावधर तनखा गांवास आबादानीचें (६८८).

**आज्ञापत्रें**— गोविंद भटास मोहोतर्फाचा तगादा न करणेंबाबत रामाजी वाकडे, बाजी केशव यांना (९४५८); आज्ञेप्रमाणे हुजूर येणें म्हणून जानराव घाटगेस (४८०); आसलगांवचा वसूल निलो अनंत देत नाहींत म्हणून तेथील मोकदमास (४८१); हत्तींची निगा राखणेबाबत चिमणाजी पंडित सचिवास, खासगी गांवास उपद्रव न देणें म्हणून परशराम जगजीवनास, जोरखोरे व जांबळखोरे येथील देशमुखीच्या गल्याचा व नख्त अैवजाचा वसूल हैबतराव भवानी शंकरकडे देणेंबाबत मोकदमास (४८२); भवानजी नाईकास १०० रुपये देऊन पावती घेणेंबाबत खंडेराव जाधवास, बयाबाई उपाधिणीस एक हजार रुपये देणेंबद्दल चिमणाजी पंडितास, बापूजी पासलकरास खंड व मुशाहिरा अैवज देणेंबाबत माधवराव देशपांडेस (४८६); भवानजी केशरकरास उपसर्ग न देणेंबाबत जगजीवन पंडित व येमाजीपंत यांना, रखमी डांगिणीचा जामिन कतबा सोडून देणें बाबत अंताजी शिवदेवास (४८७); वसंतगडच्या घेऱ्यास उपसर्ग न देणेंबाबत जगजीवन पंडित, सुलतानजी घाटगे, सिंदोजी थोरात यांना, वसंतगड जतन करणेंबाबत कानोजी मोहिते, समस्त वसंतगडकऱ्यांस, भवानी मिर्धाच्या मुकाशाचा अैवज कमाविसदाराजवळ देणेंबाबत पालीमच्या देशमुख देशपांडयांना, मुसाफर लाला यास जमिनीच्या हकदारीचा तगादा न करणेंबाबत कोढियेच्या मोकदमास (४८८); नजर व सरदेशमुखीचें अैवजीं नारो गोविंदास रुपये देणेंबद्दल मानाजी आंगरेस (५७३); लिंगो रुद्र व विठल सामराजास तक्षिमेचा भाग देण्याबाबत भवानी शंकरास (५७४); नाना पुराणिकास साहित्य करणेंबाबत (५७७); कारखानें, घर दुरुस्त करण्याबद्दल

